१) कै.बापूसाहेब एन.झेड.मराठे विधायक संस्था, थाळनेर संचलीत मतीमंद मुलांचे विद्यालय, मु.पो.शिरपूर, जि.धुळे, २) सम्यक संकल्प पुणे संचलीत नरसिंह मुकबधीर शाळा, येळेगांव, जि.बुलढाणा व ३) ह.भ.प.सेवालाल महाराज बहुउद्देशीय शिक्षण संस्था संचलीत साईबाबा मतीमंद विद्यालय, माहोळ, जि.सोलापूर या तीन विशेष प्रवर्गाच्या शाळांना विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इडीडी २०२१/प्र.क्र.१/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०२१.

<u>वाचा</u> :
1. शासन निर्णय सामाजिक न्याय विभाग क्र.ईडीडी २००१/प्र.क्र.५०२/सुधार-२, दि.१९.७.२००३ व समक्रमांकाचे शासन पुरकपत्र दि.४.१२.२००३.
2. शासन निर्णय सामाजिक न्याय विभाग क्र.ईडीडी २००३/प्र.क्र.३४०/भाग-२/ सुधार-२, दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६.
3. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे क्र.अकआ/प्र-४-मती/एन झेड मराठे/ अनु.मान्यता/२०१६-१७/१०५६ दि.०७.१२.२०१७, अकआ/प्र-४-मती/सेवालाल महाराज /स्थलांतर /सोलापूर/२०१८-१९/६८२ दि.२२.०२.२०१९.

<u>प्रस्तावना</u> :-

१) कै.बापूसाहेब एन.झेड.मराठे विधायक संस्था, थाळनेर संचलीत मतीमंद मुलांचे विद्यालय, मु.पो.शिरपूर, जि.धुळे, २) सम्यक संकल्प पुणे संचलीत नरसिंह मुकबधीर शाळा, येळेगांव, जि.बुलढाणा व ३) ह.भ.प.सेवालाल महाराज बहुउद्देशीय शिक्षण संस्था संचलीत साईबाबा मतीमंद विद्यालय, माहोळ, जि.सोलापूर या तीन विनाअनुदान तत्वावरील शाळांना विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्याबाबतच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

(१) कै.बापूसाहेब एन.झेड.मराठे विधायक संस्था, थाळनेर संचलीत मतीमंद मुलांचे विद्यालय, मु.पो.शिरपूर, जि.धुळे या मतिमंद मुलांच्या विशेष शाळेला ५० निवासी विनाअनुदानीत विद्यार्थी संख्येस आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोदणी प्रमाणपत्र क्र. डी-२९७, दि.०३.०६.२००९,

(२) सम्यक संकल्प पुणे संचलीत नरसिंह मुकबधीर शाळा, येळेगांव, जि.बुलढाणा या मुकबधीर मुलांच्या विशेष शाळेला ५० निवासी विनाअनुदानीत विद्यार्थी संख्येस आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोदणी प्रमाणपत्र क्र. पीएन-१०/पुणे,१८.१२.२०१४ व

(३) ह.भ.प.सेवालाल महाराज बहुउद्देशीय शिक्षण संस्था संचलीत साईबाबा मतीमंद विद्यालय, माहोळ, जि.सोलापूर या मतिमंद मुलांच्या विशेष शाळेला ५० निवासी विनाअनुदानीत विद्यार्थी संख्येस आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोदणी प्रमाणपत्र क्र. पीएन-४/ सोलापूर,दि.०८.१२.२०१४ रोजी विनाअनुदान तत्वावर शाळेस मान्यता प्रदान करण्यात

आली असून, सदरहू तिन्ही शाळांना एक विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर खालील अटीं व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती खालील प्रमाणे आहेत</u>** :-

१) सदरहू तीनही शाळांना शासनाने वेळेवेळी निश्चित करतील अशा अटी व शर्ती लागू राहतील.

२) सदरहू तीनही शाळांना अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत असून, याअनुषंगाने वेतनेत्तर अनुदान व पदनिर्मितीबाबत उच्च स्तरीय सचिव समिती व वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी व तद्नंतरच सदर शाळांना वेतनेत्तर अनुदान व पदनिर्मिती अनुज्ञेय राहील.

३) सदरहू तीनही शाळांना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.८.४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील प्रपत्र-ब व प्रपत्र-क मध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती लागू राहतील.

४) सदर अपंगांच्या विशेष शाळांना केंद्र शासन स्थानिक स्वराज्य संस्थांकडून किंवा इतर संस्थांकडून नियमित अनुदान मिळत आहे असे निदर्शनास आल्यास सदर संस्था राज्य शासनाचे अनुदान मिळण्यास अपात्र ठरेल.

५) शासनाने अनुदान तत्वावर आणण्याकरीता वेळेवेळी विहित केलेल्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीचे पालन झालेले नाही असे आढळून आल्यास त्या संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

६) सदरहू तीनही शाळांना त्यांच्या मान्य विद्यार्थी संख्येवर अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत असून दि.१८.८.२००४ च्या आकृतीबंधानुसार आवश्यक असणारा कर्मचारीवृदांबाबतचा प्रस्ताव वित्त विभागामार्फत उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा. सदर मान्यतेशिवाय सदर पदांना पदमान्यता देण्यात येऊ नये.

७) मा. उच्च न्यायालयात दाखल असलेल्या रिट याचिका क्र.६९०/२०१३ डॉ.बाबासाहेब परांजपे प्रतिष्ठान आंबेजोगाई विरुद्ध महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दि. ०३.०९.२०१३ अन्वये शासनाने अपंगाच्या विशेष शाळा/कर्मशाळांच्या अनुदानाबाबत धोरण ठरविण्याचे आदेश दिले आहेत. सदर धोरणातील निकषांच्या अधीन राहून सदरहू शाळांना अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

८) १) कै.बापूसाहेब एन.झेड.मराठे विधायक संस्था, थाळनेर संचलीत मतीमंद मुलांचे विद्यालय, मु.पो.शिरपूर, जि.धुळे, २) सम्यक संकल्प पुणे संचलीत नरसिंह मुकबधीर शाळा, येळेगांव, जि.बुलढाणा व ३) ह.भ.प.सेवालाल महाराज बहुउद्देशीय शिक्षण संस्था संचलीत साईबाबा मतीमंद विद्यालय, माहोळ, जि.सोलापूर या तीनही शाळांना “अ“ श्रेणी प्राप्त असल्याने मा.मंत्री (सा.न्या.) महोदय यांच्या मान्यतेने “विशेष बाब” म्हणून सदरहू तीनही शाळांना मान्यता देण्यात येत आहे. परंतु यापुढे इतर अपंगांच्या शाळा /कर्मशाळांच्या मान्यतेसाठी ही बाब लागू असणार नाही.

२. सदर शासन निर्णय हा मा.मंत्री (सा.न्या.) महोदय यांच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचे संकेतांक २०२११०२८१४१५५७०३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, pseudonym=2097D404DF0287B8EA9B9CB128B351603D2AB8BA, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2021.10.28 14:20:56 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव (सा.न्या.) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
४. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
५. प्रादेशिक उप आयुक्त समाज कल्याण अधिकारी, पुणे/नाशिक /अमरावती.
६. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,धुळे/सोलापूर/बुलढाणा.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे/सोलापूर/बुलढाणा.
९. अध्यक्ष, कै.बापूसाहेब एन.झेड.मराठे विधायक संस्था, थाळनेर संचलीत मतीमंद मुलांचे विद्यालय, मु.पो.शिरपूर, जि.धुळे,
१०. अध्यक्ष, सम्यक संकल्प पुणे संचलीत नरसिंह मुकबधीर शाळा, येळेगांव, जि.बुलढाणा
११. अध्यक्ष,ह.भ.प.सेवालाल महाराज बहुउद्देशीय शिक्षण संस्था संचलीत साईबाबा मतीमंद विद्यालय, माहोळ, जि.सोलापूर.
१२. निवडनस्ती, दिव्यांग कल्याण-१.

******